**महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीसाठी उपलब्ध करून देण्यात आलेल्या तांत्रिक मनुष्यबळाकरीता रु.४,९८,०६०/- इतकी रक्कम अदा करण्याबाबत ..**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्र.व्हीओसी-२०१८/प्र.क्र.१५/व्यशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०००३२
दिनांक : ४ फेब्रुवारी, २०२०

वाचा : १) वित्त विभाग पत्र क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२७/कोषा प्रशा-४, दिनांक ०३ नोव्हेंबर,२०१८
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग अ.शा.पत्र क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.११०/आस्था-२, दिनांक २५ ऑक्टोबर,२०१९

**प्रस्तावना :**

उच्च व तंत्र शिक्षणविभागातंर्गत सर्व अकृषी विद्यापीठे, सर्व अनुदानित महाविद्यालये इतर अनुदानित संस्थामध्ये कस्टमाईज्ड एचटीई सेवार्थ प्रणाली राबविण्यासाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) यांना नेमण्यात आले असून सदर प्रणालीमध्ये कौशल्य विकास व उद्योजकता विभागाचाही समावेश आहे. या “एचटीई सेवार्थ” प्रणालीमार्फत या विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या अशासकीय अनुदानीत तंत्र माध्यमिक शाळा व उच्च माध्यमिक विद्यालयातील व्यवसाय अभ्यासक्रमामधील (व्दिलक्षी व उच्च माध्यमिक व्यवसाय) कर्मचा-यांचे वेतन व भत्ते ऑनलाईन पध्दतीने अदा करण्यात येते.

“एचटीई सेवार्थ” प्रणालीचा विकसन व देखभालीचा करारनामा माहे जुलै,२०१८ अखेर संपुष्टात आला असल्याने याबाबतची सर्व जबाबदारी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) कडे सोपविण्यात आली आहे. सदर प्रणाली नियमीत राहणेसाठी MahaIT यांच्याशी स्वतंत्र करारनामा करून स्वतंत्र तांत्रिक मनुष्यबळ नेमून कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीचे विकसन व देखभाल करण्याची कार्यवाही करणेबाबत वित्त विभागाने दिनांक ३ नोव्हेंबर २०१८ च्या पत्रान्वये कळविले आहे.

महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) शी झालेल्या करारानुसार कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीचे विकसन व देखभाल तसेच तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करणे यासाठी MahaIT शी उच्च व तंत्र शिक्षण विगागामार्फत करार करण्यात आला आहे. सदर प्रणालीमध्ये उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे ६९००० अधिकारी व कर्मचारी आणि कौशल्य विकास व उद्योजकता विभागाचे ९५३५ अधिकारी व कर्मचारी समाविष्ट आहेत. अधिकारी व कर्मचारी यांची संख्या विचारात घेतली तर ती उच्च व तंत्र शिक्षण विभागाची ८७ टक्के व कौशल्य विकास व उद्योजकता विभागाची १३ टक्के इतक्या प्रमाणात आहे. सन २०१९ करीता MahaIT शी झालेल्या करारानुसार कस्टमाईज्ड

सेवार्थ प्रणालीचे विकसन व देखभाल तसेच तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करणे यासाठी MahaIT ला एकुण रु.३८,३१,२२९/- इतकी रक्कम द्यावयाचे ठरले आहे. MahaIT ला अदा करावयाचे रक्कमेपैकी १३ टक्के म्हणजेच रु.४,९८,०६०/- इतकी रक्कम MahaIT ला या विभागामार्फत अदा करण्याबाबत उच्च व तंत्र शिक्षण विभागाने दिनांक २५ ऑक्टोबर,२०१९ च्या अर्धशासकीय पत्रान्वये कळविले आहे. त्यानुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) ला रु.४,९८,०६०/-(अक्षरी रु.चार लाख आठ्याण्णव हजार साठ फक्त ) इतकी रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ (MahaIT) शी झालेल्या करारानुसार कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीचे विकसन व देखभाल तसेच तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करणे यासाठी MahaIT ला अदा करावयाच्या एकुण रु.३८,३१,२२९/- इतक्या रक्कमेपैकी विभागाच्या अधिकारी व कर्मचारी यांचे प्रमाणात १३ टक्के म्हणजेच रु.४,९८,०६०/- (अक्षरी रु.चार लाख आठ्याण्णव हजार साठ फक्त ) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम विभागाच्या कक्ष अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी (रोखशाखा) यांचेमार्फत धनादेशाद्वारे महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित (MahaIT) यांना अदा करण्यात यावी.

३. सदर बाबीवर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडए-२, (०१) (०७) ई-प्रशासन (कार्यक्रम) (२२३०६१०९) १७, संगणक खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये सुधारित केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र.४ अन्वये परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०४११२२२९४८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2020.02.04 11:27:07 +05'30'

**( संतोष रोकडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई
२) सह सचिव/ सर्व उप सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

३) कक्ष अधिकारी (रोखशाखा),आहरण व संवितरण अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ,मंत्रालय,मुंबई

५) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६) संचालक, लेखा व कोषागरे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,मुंबई

७) महालेखापाल ½ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य,मुंबई

८) महालेखापाल ½ लेखा व परीक्षा, महाराष्ट्र राज्य,मुंबई

९) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई

११) अपर मुख्य सचिव,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१२) कौशल्य विकास व उद्योजकता विभागातील सर्व कार्यासने

१३) निवड नस्ती, व्यशि-४